**पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना मृग बहार सन २०२२ साठी राज्य हिस्साची रू.२२,४०,५८,८७८/- इतकी रक्कम विमा कंपनीस अदा करण्यासाठी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः फवियो-२०२२/प्र.क्र.१३९/१०-अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: १३ मार्च, २०२३

वाचा -

१. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. फवियो-२०२१/प्र.क्र.८१/१०- अे, दि.१८ जून २०२१
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क.४३/अर्थ-३, दि.०४/०४/२०२२
३. शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.फवियो-२०२२/प्र.क्र.१३९/१०-अे,दि.०८.०९.२०२२
४. कृषि संचालक (वि.प्र), कृषि आयुक्तालय, पुणे पत्र जा.क्र.कृआ/ मुसां/ पुहआफपिवियो/अ.मा /२४७३/२०२३, दि.२०.०१.२०२३

**प्रस्तावना :-**

शेतकऱ्यांच्या फळ पिकांना हवामान धोक्या पासून विमा संरक्षण दिल्यास शेतकऱ्यांचे आर्थिक स्थैर्य अबाधीत राखण्याच्या दृष्टीने मदत व्हावी, त्यासाठी राज्यात प्राधान्याने पुनर्रचित हवामान आधरित फळपिक विमा योजना राबविण्यात येत आहे. विविध हवामान धोक्यांमुळे फळपिकाच्या उत्पादकतेवर विपरीत परिणाम होऊन मोठ्या प्रमाणावर उत्पादनामध्ये घट येते. पर्यायाने शेतकऱ्यांना अपेक्षित उत्पादन न मिळाल्याने आर्थिक संकटाला तोंड द्यावे लागते. या सर्व बाबींचा विचार करुन शेतकऱ्यांना फळपिक नुकसान भरपाई मिळण्यासाठी एक उपाय म्हणुन पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजना राज्यात सन २०२१-२२ , २०२२-२३ व २०२३-२४ या तीन वर्षामध्ये संत्रा, मोसंबी, डाळिंब, चिकू, पेरू, लिंबू, सिताफळ व द्राक्ष (क) (मृग बहार) या ८ फळपिकांसाठी २६ जिल्हयामध्ये महसूल मंडळ हा घटक धरुन एचडीएफसी एर्गो जनरल इन्शुरन्स.कं.लि., रिलायन्स जनरल इन्शुरन्स.कं.लि. व भारतीय कृषि विमा कंपनी लि. या विमा कंपन्यांमार्फत संदर्भ क्र. १ मधील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे.

पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजनेत सन २०२२ मृग बहारासाठी भारतीय कृषि विमा कंपनीने मागणी केल्यानुसार राज्य हिस्सा अनुदान वितरीत करण्याची मागणी कृषी आयुक्तालयाने संदर्भ क्र.५ अन्वये सादर केली आहे. सदर विनंतीस अनुसरून पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना मृग बहार सन २०२२ मध्ये राज्य हिश्श्याचा रु.२२,४०,५८,८७८/- इतका निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पुनर्रचित हवामान आधारीत फळपीक विमा योजना मृग बहार सन २०२२ अंतर्गत कृषि आयुक्तालयाने केलेली शिफारस विचारात घेता राज्य हिस्सा विमा हप्ता अनुदानापोटी रु.२२,४०,५८,८७८/- इतकी रक्कम योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार विमा कंपन्यांना अदा करण्यासाठी भारतीय कृषि विमा कंपनीस उपलब्ध करून देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरची रक्कम मृग बहार हंगाम २०२२ करीता वितरीत करण्यात येत असून त्याचा वापर इतर हंगामाकरीता अनुज्ञेय असणार नाही.

२. प्रस्तुत बाबीवर होणरा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ करीता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा**
**(००)(०७) हवामान आधारित फळपीक विमा योजना राज्य हिस्सा**
**(२४०१ ९४०२) ३३-अर्थसहाय्य**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहायक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजनेच्या मार्गदर्शक सुचना आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परिपत्रक नुसार खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.८८/१४३१ दि.१३/०२/२०२३ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.५१/२०२३/व्यय१ दि.२१/०२/२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१३१६०९५७५४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SARITA RISHI
BANDEKAR DESHMUKH

Digitally signed by SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=5140223e17381bc47a67b9fede8dda33c03e3e9ce591f826d8193080c68a08b8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E40A063B6B4E8F59F91F350AA6FEC292A55DB5BF8829C64D6C44E00A701CDAAC, cn=SARITA RISHI BANDEKAR DESHMUKH
Date: 2023.03.13 16:14:52 +05'30'

**(सरिता बांदेकर - देशमुख)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
२. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
७. सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१०.वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई- ३२
११.सह सचिव (१०-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१२.कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१४.विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०० ०२३.
१५.विभागीय व्यवस्थापक, रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी लि., वेस्टर्न एक्सप्रेस हायवे, ५ वा मजला, चिंतामणी अव्हेन्यू, विरानी औद्योगिक वसाहत जवळ, गोरेगाव (इ), मुंबई - ४०००६३
१६.विभागीय व्यवस्थापक, एचडीएफसी एर्गो जनरल इन्शुरन्स कं. लि. पहिला मजला, एचडीएफसी हाऊस, १६५-१६६ बॅकबे रिक्लॅमेशन, एच.टी. पारेख मार्ग, चर्चगेट, मुंबई-४०००२०
१७. निवडनस्ती (कार्यासन १०-अे).